**दि.२९ जुलै, २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागात काम करणाऱ्या कंत्राटदाराची नाम नोंदणी (Enlistment of PWD Contractors) व शासन निर्णयाची अंमलबजावणी करण्यासंदर्भात कंत्राटदारांनी उपस्थित केलेल्या अडचणी विचारात घेऊन त्यांचे निराकरण करण्यासंदर्भात अभ्यास समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्र. बीडीजी २०२०/प्र.क्र.१४७ /इमा-२**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दि. ०७/०९/२०२०.

वाचा :- १) शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/ प्र.क्र.१४७ / इमा-२ दि. २९ जुलै, २०२०.

**प्रस्तावना :-**

दि.२९ जुलै, २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागात काम करणाऱ्या कंत्राटदाराची नाम नोंदणी (Enlistment of PWD Contractors) बाबत मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. या शासन निर्णयाच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य कंत्राटदार महासंघ यांनी विविध अडचणी मांडलेल्या आहेत. तसेच यासंदर्भात काही कंत्राटदारांनी अडचणी असल्याबाबत कळविले आहे. त्यास अनुसरून या शासन निर्णयातील बाबी व शासन निर्णयाची अंमलबजावणी करण्यासंदर्भात कंत्राटदारांनी उपस्थित केलेल्या अडचणी विचारात घेऊन त्यांचे निराकरण करणे आवश्यक आहे. तसेच या संदर्भात शासन निर्णयामध्ये आवश्यकता वाटल्यास सुधारणा करणे क्रमप्राप्त आहे.

**शासन परिपत्रक :-**

त्यास अनुसरून दि.२९ जुलै, २०२० रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदी व त्यांच्या अंमलबजावणी संदर्भात विविध कंत्राटदार संघटना / कंत्राटदार यांनी उपस्थित केलेल्या अडी-अडचणी विचारात घेऊन शासन निर्णयात आवश्यकतेनुसार सुधारणा सुचविणे बाबत खालील प्रमाणे अभ्यास समिती नेमण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | श्री. अजित सगणे, सचिव (बांधकामे) | अध्यक्ष |
| २. | श्री. उल्हास देबडवार, सचिव (रस्ते) | सदस्य |
| ३. | श्री. सदाशिव साळुंखे, मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.वि., पुणे | सदस्य |
| ४. | श्री. प्रकाश इंगोले, मुख्य अभियंता, सा.बां. प्रा.वि. कोकण | सदस्य |
| ५. | श्री. राजेंद्र जवंजाळ, उपसचिव (इमा) | सदस्य सचिव |
| ६. | श्रीमती. सुषमा साखरवाडे, अधीक्षक अभियंता, सा.बसं.मंडळ, चंद्रपूर | सदस्य |
| ७. | सर्व प्रादेशिक विभागातील प्रत्येकी २ कंत्राटदार प्रतिनिधी | सदस्य |

३. समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय दि.२९ जुलै, २०२० सार्वजनिक बांधकाम विभागात काम करणाऱ्या कंत्राटदाराची नाम नोंदणी (Enlistment of PWD Contractors) बाबत मार्गदर्शक सूचना यांस अनुसरून विविध संघटना / कंत्राटदार यांनी उपस्थित केलेल्या अडचणी विचारात घेऊन शासन निर्णय अंमलबजावणीच्या दृष्टीने आवश्यक त्या सुधारणा सुचविणे व सुधारीत मसुदा तयार करून १ महिन्यात शासनास सादर करणे.

४. दि. २९ जुलै, २०२० रोजीच्या शासन निर्णयामधील (अ) मध्ये सदर नियम शासन मान्यता मिळाल्याच्या दिनांकापासून लागू होतील असे नमूद आहे. तथापि, सदर शासन निर्णयाच्या अनुषंगाने विविध संघटना / कंत्राटदार

यांनी उपस्थित केलेल्या अडचणी विचारात घेऊन सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी सद्य:स्थितीत पुढील आदेशापर्यंत स्थगित ठेवण्यात येत असून निविदेबाबतची सर्व कार्यवाही या पूर्वीच्या पध्दतीप्रमाणे अमलात राहील.

उपरोक्त शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२००९०८१२२६११८०१८ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SACHIN MANIKRAO CHIVATE

Digitally signed by SACHIN MANIKRAO CHIVATE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=643026ceca9d6dc21fa6c4525f6fd9fbdfc59a9a42af9ca3066f28a4b58ad630, cn=SACHIN MANIKRAO CHIVATE
Date: 2020.09.08 12:27:30 +05'30'

**( सचिन चिवटे )**
अवर सचिव (इमारती), महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
३. मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव
४. अ.मु.स.(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अ.मु.स.(सा.बां.)/सचिव (रस्ते)/सचिव (बांधकामे), सा.बां.विभाग, मंत्रालय,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई / निवासी लेखा अधिकारी, मुंबई
९. सर्व मुख्य अभियंते, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग व (विद्युत) विभाग
१०. सर्व अधिक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम मंडळ व (विद्युत) मंडळ,
११. सर्व अधिकारी व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,
१२. निवडनस्ती (इमारती-२).